सहकार अधिकारी श्रेणी-१/कार्यालय अधिक्षक, संवर्गातून सहायक निबंधक, सहकारी संस्था,गट-ब संवर्गात पदोन्नती देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राजस-१२१३/प्र.क्र.३०३/१२-स**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम काम मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ११ सप्टेंबर,२०१४

**वाचा :-**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. आस्था/कक्ष-१/वै (एस.एस.जी)/ पदो/१४, दिनांक १२.०५.२०१४.

२) शासनाचा समक्रमांकाचा दि.१६.०७.२०१२ चा शासन निर्णय

**प्रस्तावना :-**

वाचा क्र.२ चा शासन निर्णय क्र. राजस-१२११/प्र.क्र.२८४/१२-स, दि.१६.०७.२०१२ अन्वये सहकार अधिकारी श्रेणी-१ / कार्यालय अधिक्षक संवर्गातील सहायक निबंधक, सहकारी संस्था,गट-ब संवर्गात एकूण ४४ कर्मचाऱ्यांना सहायक निबंधक, सहकारी संस्था, वर्ग-२ या पदावर प्रपत्र-अ नुसार नियमित पदोन्नत्या देण्यात आल्या आहेत तसेच प्रपत्र-ब नुसार १९ कर्मचाऱ्यांना निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नती देण्यात आली आहे. सदरहू निवडसूचीतील श्री.एस.एस.गिते, सहकार अधिकारी श्रेणी-१ यांच्या विभागीय चौकशीच्या अनुषंगाने त्यांचे एसीबी प्रकरण न्यायप्रविष्ट असल्याने, त्यांना पदोन्नती देता येणार नसल्याची शिफारस करुन न्यायालयीन निर्णय झाल्यानंतर या प्रकरणी निर्णय घेणे योग्य होईल असा निर्णय विभागीय पदोन्नती समितीने घेतला होता. त्यानुसार श्री.गिते यांच्या विरुध्द अतिरिक्त विशेष सत्र न्यायालय, नाशिक येथे दाखल केलेल्या स्पेशल केस नं.२/२००८ मध्ये दि.१२.०३.२०१३ रोजी निकाल पारित करण्यात येऊन श्री.गिते यांना निर्दोष मुक्त केले आहे. त्यामुळे श्री.गिते यांना पदोन्नतीने पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

विभागीय पदोन्नती समितीने उपरोक्त प्रमाणे घेतलेल्या निर्णयानुसार घेतल्यानुसार श्री. एस.एस.गिते, सहकार अधिकारी श्रेणी-१ यांना सहायक निबंधक, सहकारी संस्था, गट-ब या संवर्गात नियमित पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदस्थापना खालीलप्रमाणे दर्शविण्यात येत आहे.:-

| अ. क्र. | कर्मचाऱ्यांचे नाव | जातीचा प्रवर्ग | पदोन्नती चा प्रवर्ग | वाटप केलेला महसूल विभाग | पदोन्नतीनंतर पदस्थापनेचे पद |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री.एस.एस.गिते | इमाव | खुला | औरंगाबाद | सहायक निबंधक, सहकारी संस्था (दुग्ध) जालना या रिक्त पदी |

२. सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना दि.०८.०७.२०१० अन्वये सदर पदोन्नत अधिकाऱ्यांना वाटप केलेल्या विभागात पदस्थापना देण्यात येत असून सदर अधिसूचनेतील तरतूदी त्यांना लागू राहतील.

३. सामाजिक न्याय व आदिवासी विकास विभागाच्या आदेशानुसार श्री.गिते यांनी विभागीय जात प्रमाणपत्र पडताळणी समिती नाशिक विभाग, नाशिक यांनी प्रमाणित केलेले जात वैधता प्रमाणपत्र सादर केले आहे.

४. सदरहू कर्मचाऱ्यांची सहायक निबंधक, सहकारी संस्था, गट-ब या पदावरील पदोन्नती त्यांच्या विरुध्द अन्य कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित नाही या धारणेच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

५. उपरोक्त पदोन्नत श्री.गिते यांनी आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत लाभ मिळालेल्या पदोन्नतीच्या पदावरील त्यांच्या वेतननिश्चिती संबंधीचा विकल्प पदोन्नतीच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत द्यावा. अशा प्रकारचा विकल्प न दिल्यास त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम (११)(१)(ए) खाली पदोन्नतीचा दिनांक विचारात घेवून करावी.

६. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अमंलात येतील असे पहावे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१११७४३३९७१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Muloo Dhadwe

Digitally signed by Suresh Muloo Dhadwe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suresh Muloo Dhadwe
Date: 2014.09.11 17:38:15 +05'30'

**(सु.मु.धाडवे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य पुणे
२. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य पुणे
३. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य पुणे
४. संचालक, वस्त्रोद्योग, नागपूर
५. सर्व विभागीय सह निबंधक, सहकारी संस्था (प्रशासन)
६. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था
७. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता)
८. सर्व जिल्हा कोषागा र अधिकारी,

९. सर्व संबंधित कर्मचारी द्वारा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. खाजगी सचिव मा.मंत्री (सहकार/पणन/वस्त्रोद्योग),मा.राज्यमंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग)
११. अपर मुख्य सचिव (वस्त्रोद्योग) / सचिव (सहकार) यांचे स्वीय सहायक,
१२. कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग (१६-ब , १२ ), मंत्रालय, मुंबई-३२.
१३.निवड नस्ती/ का.१२-स